**मंत्रालयात अभ्यागतांना व वाहनांना**
**प्रवेश देण्याबाबत मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. पीईएस- ४२१/प्र.क्र.१०८/विशा-४,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि.२४ डिसेंबर, २०२१.

**वाचा :**

१.शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीईएस-०४२१/प्र.क्र.१०८/विशा-४, दि.२९.०६.२०२१

**प्रस्तावना-**

मंत्रालयात अभ्यागतांना व वाहनांना प्रवेश देण्यासंदर्भात शासनास प्राप्त झालेल्या सूचना/निवेदने व त्याचप्रमाणे संदर्भीय शासन निर्णयानुसार काम करताना आलेले अनुभव विचारात घेवून सुधारीत मार्गदर्शक सूचना विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

संदर्भाधीन शासन निर्णय अधिक्रमित करुन मंत्रालयात अभ्यागतांना व वाहनांना प्रवेश देण्याबाबत पुढीलप्रमाणे सुधारीत मार्गदर्शक सूचना विहित करण्यात येत आहेत.

**अ) मंत्रालयाच्या आवारात वाहनांना "पार्किंग पास" देणेबाबत:-**

खाली नमूद केलेल्या पदांवरील व्यक्तींच्या वाहनास (प्रत्येकी एक) मंत्रालय मुख्य प्रवेशव्दारातून प्रवेश तसेच त्या वाहनास मंत्रालयाच्या आवारात उभे करण्यासाठी "पार्किंग पास" अनुज्ञेय राहील.

१. मा.राज्यपाल
२. मा.मुख्यमंत्री
३. मा.उपमुख्यमंत्री
४. मा.मुंबई उच्च न्यायालयाचे मुख्य व इतर न्यायाधीश
५. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद
६. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा
७. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद
८. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान सभा
९. सर्व मा.मंत्री व राज्यमंत्री (विद्यमान)
१०.मा.उप सभापती, महाराष्ट्र विधान परीषद
११.मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा

१२.मा.महापौर, बृहन्मुंबई

१३.मुंबईचे मा.नगरपाल

१४.महाराष्ट्र शासनाच्या विविध महामंडळावरील अध्यक्ष (सर्व) (मंत्री पदाचा दर्जा असलेले)

१५.अध्यक्ष, वैधानिक विकास मंडळ (सर्व)

१६.मा.महाअधिवक्ता, मुंबई उच्च न्यायालय

१७.मा.लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य

१८. मा.उप लोकआयुक्त, महाराष्ट्र राज्य

१९.मा.राज्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य

२०.मा.आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य

२१.मा.आयुक्त, महाराष्ट्र लोकसेवा हक्क आयोग, महाराष्ट्र राज्य

२२.मा.माहिती आयुक्त, बृहन्मुंबई

२३.मा.अध्यक्ष, महाराष्ट्र लोकसेवा आयोग

२४.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

२५.मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व)

२६.मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य

२७.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य

२८. पोलीस आयुक्त, मुंबई

२९.आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका

३०.मा.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, महाराष्ट्र

३१.अपर पोलीस महासंचालक दर्जाचे अधिकारी (सर्व)

३२.केवळ मंत्रालयीन विभागातील दिव्यांग अधिकारी/कर्मचारी यांचे दुचाकी वाहन

**ब) वाहनांना "ड्रॉपिंग पास" देणेबाबतः-**

खाली नमुद केलेल्या पदांवरील व्यक्तींच्या शासकीय/कार्यालयीन वाहनास (प्रत्येकी एक) मंत्रालय मुख्य प्रवेशव्दारातून प्रवेश अनुज्ञेय राहील. अशा वाहनांस "ड्रॉपिंग पास" अनुज्ञेय राहील. मात्र या वाहनास मंत्रालयातील आवारात वाहन उभे करणे (पार्किंग) अनुज्ञेय नसेल.

१. मा.खासदार व मा.आमदार (सर्व विद्यमान)
२. मा.मुख्यमंत्री/उप मुख्यमंत्री/ मंत्री /राज्यमंत्री यांच्या कार्यालयातील कार्यालयीन/ शासकीय वाहने

३. मंत्रालयीन विभागांची कार्यालयीन वाहने (सर्व)

४. महाराष्ट्र शासनाच्या अख्यत्यारीतील विविध आयुक्तालये / संचालनालये /आयोग / प्राधिकरणे इ. कार्यालयातील व्यवस्थापकीय संचालक / संचालक / सचिव पदावरील (भा.प्र.से/भा.पो.से. संवर्गातील) अधिकारी

५. केवळ मंत्रालयीन विभागातील दिव्यांग अधिकारी/कर्मचारी यांचे चारचाकी वाहन

**<u>अटी व शर्ती:-</u>**

१. उपरोक्त "अ" व "ब" येथे नमुद वाहनांवर चिटकविण्यासाठी प्रवेशपास मिळावा याकरीता संबंधित पदावरील व्यक्तींने अथवा त्यांच्या कार्यालयाने नमुना-१ मध्ये अर्ज सादर करणे आवश्यक असेल.

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. शापसे-३४२० /प्र.क्र. ५४ /का. ३१, दि.१०.०८.२०२० अन्वये शासकीय कार्यालयांना वाहन पुरविण्यासाठी खाजगी पुरवठादार नेमण्यात आले आहेत. अशा पुरवठादारांकडून किंवा इतर कोणत्याही वाहन पुरवठादाराकडून करारावर उपरोक्त "अ" आणि "ब" येथे नमुद केलेल्या पदांवरील व्यक्तींना वाहन पुरविण्यात आले असल्यास त्या वाहनास "अ" अथवा "ब" मध्ये नमुद केल्याप्रमाणे पार्किंग अथवा ड्रॉपिंग पास अनुज्ञेय असेल. मात्र, ते वाहन संबंधित व्यक्तीच्या वापरात आहे असे त्या पदावरील व्यक्तींने स्वत: अथवा त्यांच्या कार्यालयाने प्रमाणित करणे आवश्यक असेल.

३. विद्यमान खासदार व आमदार महोदयांना त्यांच्या वापरात असलेल्या केवळ एका वाहनास ड्रॉपिंग पास अनुज्ञेय राहील.

४. याव्यतिरिक्त ज्या, खाजगी व्यक्तींना प्रवेशपास देणे किंवा खाजगी व्यक्तींच्या वाहनांस एखाद्या मंत्रालयीन विभागाशी संबंधीत शासकीय कामानिमित्त मंत्रालयात नियमितपणे प्रवेश देणे आवश्यक असल्यास त्या विभागाच्या अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांनी जर त्यांच्या स्वाक्षरीने तशी शिफारस केली तर अशा खाजगी व्यक्तींना प्रवेशपास किंवा खाजगी व्यक्तीच्या वाहनास "ड्रॉपिंग पास" देता येईल.

५. दिव्यांग व्यक्तींच्या चारचाकी/दुचाकी वाहनांस प्रादेशिक परिवहन विभागांचे दिव्यांगाचे वाहन (Adapted Vehicle) असे प्रमाणपत्र दिलेले असणे आवश्यक असेल.

**<u>क) मंत्रालयीन प्रवेशासाठी एक वर्षाचा तात्पुरता प्रवेशपास देणेबाबत:-</u>**

[I] खालील व्यक्तींना मंत्रालयामध्ये प्रवेश करण्यासाठी एका कॅलेंडर वर्ष मुदतीचा तात्पुरता प्रवेशपास अनुज्ञेय राहील:-

१. पद्य पुरस्कार/महाराष्ट्र भूषण/महाराष्ट्र गौरव/दलित मित्र/डॉ.बाबासाहेब आंबेडकर समाजभूषण पुरस्कार/ दिव्यांगमित्र पुरस्कार प्राप्त व्यक्ती
२. सर्व महानगर पालिकांचे महापौर
३. सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
४. महाराष्ट्र शासनच्या सर्व महामंडळांचे अध्यक्ष
५. केंद्रीय निवडणूक आयोगाकडून मान्यताप्राप्त सर्व राष्ट्रीय तसेच राज्यस्तरीय राजकीय पक्षांचे अध्यक्ष व त्या पक्षांनी प्राधिकृत केलेल्या ५ व्यक्ती
६. केंद्रीय/राज्य निवडणूक आयोगाकडून मान्यताप्राप्त इतर सर्व राजकीय पक्षांचे अध्यक्ष व त्यांनी प्राधिकृत केलेली एक व्यक्ती.
७. सेवानिवृत्त भा.प्र.से./भा.पो.से. अधिकारी

**[II] पुढील व्यक्तींना खालील अटीच्या अधीन राहून एक वर्षाचा तात्पूरता प्रवेशपास देणे अनुज्ञेय राहील:-**

१. विद्यमान खासदार/आमदार यांचे स्वीय सहायक.
२. विधीमंडळ वार्ताहर कक्षाचे सदस्य असलेले दैनिकांचे प्रतिनिधी.
३. विविध वृत्त वाहिन्यांचे प्रतिनिधी व कॅमेरामन.
४. क्षेत्रिय कार्यालयातून टपाल घेऊन येणारे कर्मचारी.
५. मंत्रालय उपाहारगृहाला साहित्य पुरविणारे ठेकेदार व त्यांचे कर्मचारी.
६. मंत्रालयाची देखभाल व दुरुस्तीचे काम करणारे ठेकेदार व त्यांचे कर्मचारी.
७. संगणक दुरुस्तीसाठी माहिती तंत्रज्ञान विभागाने प्राधिकृत केलेल्या कंपन्यांचे तंत्रज्ञ.
८. माहिती तंत्रज्ञान विभागाने मान्यता दिलेल्या सल्लागार कंपनी /संस्थेचे कर्मचारी.
९. मंत्रालयीन विभागामध्ये कंत्राटी तत्त्वावर नियुक्त करण्यात आलेले कर्मचारी.
१०.मंत्रालय आवारात कार्यरत असलेल्या बँकेतील अधिकारी/कर्मचारी तसेच शासकीय दवाखान्यातील वैद्यकीय अधिकारी/कर्मचारी आणि पोस्ट ऑफिस मधील अधिकारी/कर्मचारी.

**अटी व शर्ती**

१. उपरोक्त सर्व व्यक्तींनी सोबतच्या विहित नमुना क्र.२ मध्ये अर्ज सादर करणे आवश्यक असेल.
२. याशिवाय, उपरोक्त अ.क्र. [II]१ वरील स्वीय सहायकांनी, त्यांना संसद सचिवालय/ महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय यांनी स्वीय सहायक म्हणून दिलेले, ओळखपत्र सादर करणे आवश्यक असेल.

३. उपरोक्त अ.क्र. [II] २ व ३ येथील नमुद प्रतिनिधींनी, शासनाच्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून मान्यता प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक असेल.

४. उपरोक्त अ.क्र. [II] ४ ते ९ येथील नमुद कर्मचाऱ्यांची संबंधित मंत्रालयीन विभागाच्या सह/उप सचिव (आस्थापना) यांनी प्रवेश पासासाठी शिफारस करणे आवश्यक असेल.

**ड) इतर शासकीय विभाग/कार्यालयातील शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना मंत्रालयात प्रवेश देणेबाबत:-**

१. माजी आमदार व खासदार यांना विधानभवनाने दिलेल्या ओळखपत्रांच्या आधारे मंत्रालयात थेट प्रवेश देण्यात येईल.

२. विधानमंडळ/ राजभवन/मा.उच्च न्यायालय/ महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण येथील कार्यरत शासकीय अधिकारी व कर्मचारी यांना त्यांचे ओळखपत्र दर्शनी भागावर लावण्याच्या अटीवर त्या आधारे मंत्रालयात थेट प्रवेश देण्यात येईल.

३. मंत्रालयीन विभागाव्यतिरिक्त क्षेत्रीय स्तरावरील अधिकारी, केंद्र शासनाचे अधिकारी/ कर्मचारी, विधानमंडळ सचिवालयातील अधिकारी, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य/ पोलीस आयुक्त, मुंबई / इतर पोलीस विभाग वा कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी, यांना मंत्रालयात बैठकीसाठी निमंत्रित केले असल्यास त्यांच्याकडील बैठकीची नोटीस अथवा पत्र तसेच त्यासोबत त्यांच्या कार्यालयीन ओळखपत्रांच्या आधारे मंत्रालयात थेट प्रवेश देण्यात यावा. याकरीता त्यांना मंत्रालय प्रवेशासाठी वेगळ्याने प्रवेशपास काढण्याची आवश्यकता राहणार नाही.

४. उक्त नमूद अधिकारी व कर्मचारी यांना बैठकीव्यतिरिक्त इतर कोणत्याही कामाकरीता मंत्रालयात यावयाचे असल्यास मंत्रालयाबाहेरील प्रवेशपास खिडक्यातून रितसर प्रवेशपास घेऊन मंत्रालयात प्रवेश मिळविता येईल.

**इ) बैठकीसाठी येणाऱ्या अभ्यागतांना मंत्रालयात प्रवेश देणे बाबत:-**

मंत्रालयात बैठकीसाठी व इतर कामासाठी येणाऱ्या अभ्यागतांना मंत्रालयात प्रवेश मिळविण्यासाठी मा.मुख्यमंत्री/मा.उपमुख्यमंत्री/मंत्री/राज्यमंत्री यांच्या कार्यालयातील खाजगी सचिव/स्वीय सहायक यांच्या स्वाक्षरीने अथवा मंत्रालयीन विभागाच्या अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव/ सह सचिव/उप सचिव यांच्या स्वीय सहायकांच्या स्वाक्षरीने नमुना क्र.३ मध्ये पोलीस उप आयुक्त, मंत्रालय सुरक्षा कक्ष, तळ मजला, मुख्य इमारत, मंत्रालय येथे पत्र देण्यात आल्यावर संबंधितांना मंत्रालयात प्रवेश देण्यात येईल.

सदर पत्र मंत्रालय सुरक्षा कक्षात प्राप्त झाल्यावर त्यांनी ते तपासून मंत्रालयातील प्रवेशव्दारावर पाठवावे व संबंधित अधिकारी/कर्मचारी/अभ्यागत यांचे ओळखपत्र व सुरक्षा तपासणी करुन त्यांना मंत्रालयात प्रवेश देण्यात यावा.

**च) सर्व साधारण अभ्यागतांना मंत्रालयात प्रवेश देण्याबाबत:-**

मंत्रालयात येणाऱ्या इतर सर्व साधारण अभ्यागतांना मंत्रालयात दुपारी ०२.०० वा. नंतर प्रवेश देण्यात येईल. अशा प्रवेशासाठी मंत्रालयात खिडक्या स्थापन करण्यात आल्या आहेत. अशा अभ्यागतांनी मंत्रालयात प्रवेश मिळविण्यासाठी आधार कार्ड, वाहन परवाना, पॅन कार्ड इ.शासन मान्य ओळखपत्र सादर करणे आवश्यक असेल. तसेच, सर्वसाधारण अभ्यागतांना प्रवेशासाठी वेळोवेळी लागू केलेल्या नियमांचे अटी व शर्तीचे अनुपालन करणे बंधनकारक असेल. ज्येष्ठ नागरिक व दिव्यांग अभ्यागत यांना रांगेत उभे राहण्यामुळे होणारा त्रास विचारात घेता त्यांना दु.**१२.००** वा. प्रवेश देण्यात यावा, तर दुपारी **२.००** नंतर ज्येष्ठ नागरिक व दिव्यांग अभ्यागत यांचेसाठी स्वतंत्र रांगेची व्यवस्था राहील. तसेच, ज्येष्ठ नागरिक व दिव्यांग अभ्यागत यांनी तत्संबंधीचे वैध प्रमाणपत्र सोबत ठेवणे आवश्यक राहील.

**छ)** मंत्रालयात प्रवेश करण्याऱ्या सर्व शासकीय अधिकारी/कर्मचारी व अभ्यागत यांनी मंत्रालयात वावर असे पर्यंत त्यांचे ओळखपत्र/प्रवेशपास दर्शनी भागावर लावणे बंधनकारक राहील. अभ्यागतांना देण्यात आलेला प्रवेशपास बाहेर जातेवेळी प्रवेशव्दारावर तैनात असलेल्या पोलीसांकडे परत करणे आवश्यक राहील.

**ज)** मंत्रालयात प्रवेश दिलेल्या वाहनांनी त्यांना देण्यात आलेला पार्किंग/ड्रॉपिंग पास वाहनाच्या पूढच्या काचेवर सहज दिसून येईल अशा पध्दतीने चिकटविणे बंधनकारक असेल त्याशिवाय, त्या वाहनांना प्रवेश देण्यात येणार नाही.

**झ)** उपरोक्त परिच्छेद क्र. "अ", "ब" व "क" येथे नमुद केलेल्या वाहनांना व अभ्यागतांना प्रवेशपास मंजूर करण्याचे अधिकार प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांना राहतील. तर अपवादात्मक प्रकरणी विशेष बाब म्हणून वाहनांना पार्किंग पास किंवा ड्रॉपिंग पास मंजूर करण्याचे अधिकार व एक वर्षांचे तात्पुरते व्यक्तीगत प्रवेशपास देण्याचे अधिकार अपर मुख्य सचिव (गृह) यांना राहतील.

**ट)** उपरोक्त "झ" मध्ये वरील प्रमाणे विहित केलेल्या सक्षम प्राधिकाऱ्यां व्यतिरिक्त इतर कोणत्याही शासकीय अधिकाऱ्यास अथवा पोलीस अधिकाऱ्यांस अभ्यागतांना व वाहनांना प्रवेश देण्याचे अधिकार असणार नाहीत. मंत्रालय प्रवेशाकरिता केवळ गृह विभागाने वितरीत केलेले तात्पुरते

प्रवेशपास वैध राहील. तसेच वॉकीटॉकीवरुन निरोप आला म्हणून वाहनास अथवा अभ्यागतांना पोलीसांनी प्रवेश देवू नये. या सुचनांचा भंग झाल्यास ती गंभीर बाब मानण्यात येईल.

**ठ)** मंत्रालय प्रवेशासाठी लागू करण्यात आलेले हे सर्व नियम मंत्रालयासमोरील नवीन प्रशासन भवन इमारतीमध्ये प्रवेशासाठी देखील लागू राहतील.

**त)** सर्व वाहन प्रवेशपास (पार्किंग व ड्रॉपिंग) तसेच सर्व अभ्यागत प्रवेशपास यांची मुदत, ते ज्या वर्षात मंजूर करण्यात येतील, त्या कॅलेंडर वर्षाच्या अखेरपर्यंत म्हणजे दि.३१ डिसेंबर पर्यंत वैध असतील. त्यानंतर त्या प्रवेशपासांचे नुतनीकरण करुन घेणे आवश्यक असेल.

या मार्गदर्शक सूचना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू होतील. त्यामुळे त्या दिनांकापूर्वी अदा करण्यात आलेला वाहन प्रवेशपास तसेच अभ्यागतांना देण्यात आलेला प्रवेश पास यांची मूदत दिनांक ३१.१२.२०२१ पर्यंत वैध राहील. त्यानंतर त्या वाहनांना व अभ्यागतांना या परिपत्रकातील सूचना लागू होतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२११२२४१४५७४३७८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Shirish Nagorao Mohod

Digitally signed by Shirish Nagorao Mohod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66fda7e745bb4928b21046cecbf7bd8f40e4950e0a99497fa2862e1d37ed75b7, serialNumber=beb4df218cab93811ed9522b6f8ac2546899b499eb80512bfa5ec939466fb620, cn=Shirish Nagorao Mohod
Date: 2021.12.24 15:00:56 +05'30'

**( शिरीष मोहोड )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत:**

१.मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२.मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव
३.मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव
४.मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
५.मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
६.मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७.सर्व सन्मानीय संसद, विधानसभा, विधानपरिषद सदस्य,मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
८.सर्व मा.मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक,
९.मा. राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव,
१०.मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
११.मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,

१२.मा.महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य,
१३.सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
१४.प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
१६. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
१६.प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय,
१७.सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१८.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१९.प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२०.मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
२१.राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई,
२२सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य
२३.सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
२४.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२५.सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/ प्रादेशिक प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
२६.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती),
२७.अध्यक्ष, इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई
२८.अध्यक्ष, नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई
२९.अध्यक्ष, भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी. डी. ओ.बॅरेक नं. १, योगक्षेमसमोर, वसंतराव भगवान चौक, नरिमन पॉईंट, मुंबई
३०.अध्यक्ष, भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही. पटेल रोड, मुंबई
३१.अध्यक्ष, भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई
३२.अध्यक्ष, राष्ट्रीय जनता दल (से.), एल. आय. सी. इमारतीसमोर, मुंबई
३३.अध्यक्ष, बहुजन समाज पार्टी, डी -१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई
३४.अध्यक्ष, शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई
३५.अध्यक्ष, महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, २०२, मातोश्री टॉवर, दुसरा मजला, पद्माबाई ठक्कर मार्ग, माटुंगा (प.), मुंबई
३६.निवडनस्ती, (कार्यासन विशा-४).

**नमुना क्र.१**

**वाहन प्रवेशिका मिळविण्याबाबतचा अर्ज**

| | | |
|---|---|---|
| १. | वाहन वापरत असलेल्या अधिकारी/पदाधिकारी यांचे नाव व पदनाम | |
| २. | वाहन क्रमांक (संपूर्ण) | |
| ३. | वाहनाची मालकी (शासकीय/शासन मान्य खाजगी पुरवठादाराकडून प्राप्त भाडेतत्त्वावरील वाहन) | |

(वाहन वापरात असलेल्या अधिकारी/पदाधिकारी/स्वीय सहायक यांची स्वाक्षरी)

टिप:- अर्जासोबत खालील कागदपत्रांची पूर्तता केल्याशिवाय अर्ज स्विकारला जाणार नाही.

१. सदर वाहनासोबत वाहनाच्या आर.सी. बुकची एक झेरॉक्सप्रत.
२. भाडेत्त्वावरील वाहन हे संबंधित शासन मान्य वाहन पुरवठादाराच्या नावाने नोंदणी झालेले असावे. तसेच ते वाहन संबंधित व्यक्तीच्या वापरात आहे असे त्या पदावरील व्यक्तीने स्वत: अथवा त्यांच्या कार्यालयाने प्रमाणित करणे आवश्यक आहे.

## नमुना क्र.२

| येथे फोटो स्टॅपल करावा | येथे फोटो चिकटवावा |
|---|---|

### मंत्रालय प्रवेशासाठी तात्पुरते प्रवेशपत्र मिळण्यासाठी अर्ज

१) संपूर्ण नाव:-

२) निवासी पत्ता:-

३) संपर्क दुरध्वनी क्र. १.कार्यालयीन:

२.भ्रमणध्वनी:

४) प्रवेशपासचा कालावधी:-

५) मंत्रालय तात्पुरता प्रवेश मागण्याचे कारण:-

अर्जदाराची स्वाक्षरी (दिनांकासहित)

अटी :- अर्जासोबत खालील कागदपत्रांची पूर्तता केल्याशिवाय अर्ज स्विकारला जाणार नाही.

१. ०२ फोटो (६ महिन्याचे आतील).
२. शासन मान्यताप्राप्त कोणत्याही एका ओळखपत्राची झेरॉक्स (स्वसाक्षांकित) प्रत.
३. खाजगी/कंत्राटी कर्मचारी असल्यास त्यासंबंधीचे करारपत्र/प्रमाणपत्र/ओळखपत्र.

**प्रमाणपत्र***

प्रमाणित करण्यात येते की, संबंधित व्यक्तीचा उपरोक्त तपशील बरोबर असून त्याचे चारित्र्य योग्य असल्याची खात्री केलेली आहे. त्यामुळे त्यांच्या प्रवेशपासाकरीता मी शिफारस करीत आहे.

( सह/उप सचिव /खाजगी सचिव )

( मंत्रालय विभागाचे नाव/मंत्री कार्यालयाचे नाव )

* खाजगी/कंत्राटी तत्त्वावरील अधिकारी/कर्मचारी यांच्या अर्जास लागू.

## नमुना क्र.३

## बैठक/सुनावणीकरीता प्रवेशपास मिळण्याबाबतचा अर्ज

१. बैठक/सुनावणीचा दिनांक :- ....................................................................................

२. बैठक/ सुनावणी ज्या विभागाने आयोजित केली आहे त्या मंत्रालयीन विभागाचे/मा.मंत्री/राज्यमंत्री कार्यालयाचे नाव:-

..........................................................................................................................

३. उपस्थित राहणाऱ्या अधिकारी/कर्मचारी/अभ्यागत यांची नावे व पदनाम :-.

| अ.क्र. | नाव | पदनाम | मोबाईल क्रमांक |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |

(प्राधिकृत अधिकाऱ्याची सही व शिक्का)

प्रति,

मुख्य सुरक्षा अधिकारी,
मंत्रालय सुरक्षा,
मंत्रालय, मुंबई

टिप:- १) सदर अर्ज मंत्रालयीन विभागातील उप सचिव व त्यावरील दर्जाच्या अधिकारी यांच्या स्वाक्षरीने अथवा मंत्री/राज्यमंत्री यांच्या कार्यालयातील खाजगी सचिव/स्वीय सहायक यांच्या स्वाक्षरीने करण्यात यावा.

२) सदर अर्जासोबत बैठक/सुनावणी नोटीसची प्रत जोडण्यात यावी.